**शासकीय विमान सेसना सायटेशन ५६० एक्सएलएस व्हीटी-व्हिडीडी करीता विमानचालन व्यवस्थापन सेवेसाठी नियुक्त एजन्सीला मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.विचासं-१११९/प्र.क्र.१७/ २८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक:- २४ एप्रिल, २०२३.

<u>वाचा</u> :१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.डीसीए-२०१२/ प्र.क्र.५०८/ २८-अ, दि.२३/०३/२०१६
२) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/ प्र.क्र.१६०/ २८-अ, दि.१/१/२०१९ ( शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
३) शासन निर्णय समक्रमांकित दिनांक २०/२/२०१९
४) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/ प्र.क्र.१६०/ २८-अ, दि.१५/७/२०२१ (दि.७/७/२०२१ च्या शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
५) कार्यासनाचे दिनांक १०/१/२०२२ चे पत्र
६) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-११२२/ प्र.क्र.१०/ २८-अ, दि.२७/४/२०२२ ( दि.१८/४/२०२२ च्या शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
७) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-११२२/ प्र.क्र.१६५/ २८-अ, दि.१८/८/२०२२ (दि.२/८/२०२२ च्या शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
८) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/ प्र.क्र.१६०/ २८-अ, (दि.२०/१०/२०२२ च्या शक्ती प्रदत्त बैठकीचे इतिवृत्त)
९) शासन पत्र दि.१३/०४/२०२३ अन्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीची चक्राकार पध्दतीची मान्यता.

**प्रस्तावना :**

शासकीय विमान सेसना सायटेशन ५६० एक्सएलएस व्हीटी-व्हिडीडी करीता विमानचालन व्यवस्थापन सेवेची नियुक्ती करण्याबाबत मे.ॲरो एअरक्राफ्ट सेल्स अँड चार्टर्ड प्रा.लि. यांची नियुक्ती दिनांक १/१/२०१६ ते ३१/३/२०१८ पर्यंत करण्यात आली होती. त्यानंतर सदर करार संपुष्टात आल्यानंतर मे. एअरक्राफ्ट सेल्स अँड चार्टर्ड प्रा.लि. यांना संदर्भ क्र.३ ते ८ अन्वये नविन निविदा प्रक्रिया लवकरात लवकर पूर्ण करण्याबाबत वेळोवेळी कळविण्यात आले आहे. सदर निविदा प्रक्रिया पूर्ण

होण्यास काही कालावधी अपेक्षित असल्यामुळे मे. एअरक्राफ्ट सेल्स अँड चार्टर्ड प्रा.लि. यांच्यासोबत हवाई वाहनाकरीता व्यवस्थापन सेवा पुरविण्याबाबत झालेल्या करारास जुन्या अटी व शर्तीच्या अधिन व नवीन निविदा प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत सहा महिन्यांची म्हणजेच दिनांक ३/०९/२०२३ म्हणजेच मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

संदर्भ क्र.९ नुसार शासन पत्र दि.१३.०४.२०२३ अन्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीने ॲरो एअरक्राफ्ट सेल्स अँड चार्टर्ड प्रा.लि. यांच्या सोबत हवाई वाहनाकरीता व्यवस्थापन सेवा पुरविण्याबाबत झालेल्या करारास जुन्या अटी व शर्तीच्या अधिन सहा महिन्याची म्हणजेच दि.३०.०९.२०२३ पर्यंत किंवा निविदा प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यास चकाकार पध्दतीने मान्यता देण्यात आली. या निर्णयानुसार शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

शासनाच्या मालकीचे विमान सेसना सायटेशन ५६० एक्सएलएस व्हीटी-व्हीडीडी याकरीता विमानचालन व्यवस्थापन सेवा (Aviation management Service) पुरविण्याकरीता मे.ॲरो एअरक्राफ्ट सेल्स ॲन्ड चार्टर्ड प्रा.लि.,नवी दिल्ली यांची नियुक्ती करण्यात आली होती. मे.ॲरो एअरक्राफ्ट सेल्स ॲन्ड चार्टर्ड प्रा.लि.,नवी दिल्ली यांना दिनांक २३/३/२०१६ च्या शासन निर्णयामध्ये निश्चित करण्यात आलेल्या दरपत्रकानुसार विमानचालन व्यवस्थापन सेवा पुरविण्यासंदर्भात सध्या अस्तित्वात असलेल्या करारास जुन्या अटी व शर्तीच्या अधिन सहा महिन्याची म्हणजेच दि.३०.०९.२०२३ पर्यंत किंवा निविदा प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. तसेच, निविदा प्रक्रिया लवकरात लवकर पूर्ण करण्यात यावी.

२. सदर बाबीसाठी होणारा खर्च मागणी क्र.ए-४, “२०७०-इतर प्रशासकीय सेवा (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण (००) (०२) विमान चालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (अनिवार्य) २०७० ०१५६” या लेखाशिर्षातंर्गत "५०-इतर खर्च" या उद्दिष्टाखाली संबंधित आर्थिक वर्षात उपलब्ध अर्थसंकल्प तरतूदीतून भागविण्यात यावा, व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. या प्रस्तावासंदर्भात उप संचालक, विमानचालन, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४.  सदरहू आदेश विमानचालन संचालनालयाच्या विविध बाबींवर निर्णय घेण्यासाठी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली कार्यरत असलेल्या शक्ती प्रदत्त समितीने चक्राकार पध्दतीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०४२६१५३०१५६६०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH KISAN WAVHAL

Digitally signed by MAHESH KISAN WAVHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=495C75B4C173C81F308BD63A1B33A5DA4EA131ED182D44EA1B502AB4662E9810, cn=MAHESH KISAN WAVHAL
Date: 2023.04.26 15:36:35 +05'30'

**(म.कि. वाव्हळ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
२. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७.सामान्य प्रशासन विभाग / कार्या.२५, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती.